नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे विद्युत मनोरे
उभारण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-०१२०/६/प्र.क्र.१२७/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ५ जुलै, २००१.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/विद्युत मनोरे ३९५/कक्ष-३,दिनांक १.११.२०००.
२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२/विनियम दिनांक १.६.१९९२.
३) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०९७/प्र.क्र.५०/९७/विनियम दिनांक ३.९.१९९९.

**शासन निर्णयः-** नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे प्रखर झोताचे विद्युत मनोरे उभारणेबाबत रु.४,३४,९३०/- चा प्रस्ताव कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला असून त्यासोबत रु.४,३४,९३०/-या खर्चाचे अंदाजपत्रक व मनो-याच्या बांधकामाचा नकाशा संबंधित अभियंत्यांच्या मान्यतेने शासनास मान्यतेसाठी सादर केला असून त्यास प्रशासकीय मान्यता देण्यासाठी शासनास विनंती केली आहे. कारागृह महानिरीक्षक यानी असेही समर्थन केले आहे की, नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे सरासरी बंदी संख्या २००० इतकी असून तेथे टोळी युध्दातील खतरनाक बंदी ठेवण्यात येतात म्हणून कारागृहाच्या सुरक्षेच्या दृष्टीने रात्रीच्या वेळीं बंद्यांच्या हालचालीवर कडक नियंत्रण ठेवणे अत्यंत आवश्यक आहे.

२. नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे विद्युल मनोरे उभारण्यास येणा-या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव कांही काळ शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर शासनाने काळजीपूर्वक विचार करुन शासन या आदेशाद्वारे व वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०९७/प्र.क्र.५०/९७/विनियम दिनांक ३.९.१९९९ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग-पहिला,उप विभाग-पाच,महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत १३४ परिच्छेदाखाली प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व संबंधित विवरणपत्रातील रकाना ५ व ६ मधील अटींच्या अधीन राहून नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे विद्युत मनोरे उभारण्यास येणारा खर्च रु.४,३४,९३०/- (रु.चार लक्ष चौतीस हजार नऊशे तीस फक्त) च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्रथम हाती घेऊन नंतरच सदरचे काम हाती घेण्यात यावे.
२) सदर प्रस्तावास आर्थिक तरतूद मंजूर झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.
३) या कामासाठी मंजूर झालेल्या अनुदानातूनच बांधकाम पूर्ण करण्यात यावे. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

३. यासाठी होणारा खर्च "लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)"मागणी क्रमांक-एच-१३ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २००१-२००२ या आर्थि वर्षात मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यांत यावा.

४.	हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४८०१/इमा-२ दिनांक १७.१.२००१ च्या मान्यतेने तसेच नियोजन विभाग व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.९२८०/सीआर ३७२/२००१/व्यय-८,दि.२७.६.२००१ च्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु.म.माने )

**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,मध्यवर्ती कारागृह,नागपूर.

कारागृहअधिक्षक,मध्यवर्ती कारागृह,नागपूर.

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.

महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.

महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.

महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा) नागपूर.

जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर.

वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.

नियोजन विभाग (का.१४११) मंत्रालय,मुंबई.

सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा.२) मंत्रालय,मुंबई.

अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,नवीन प्रशासन भवन,१२ वा मजला,मंत्रालय,मुंबई.

निवडनस्ती /पीआरएस-२.